शाळा सोडल्याच्या दाखल्यावर शिक्षणाधिकारी (प्राथमिक) / शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांच्या प्रतिस्वाक्षरीची पध्दत बंद करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २३१६/प्र.क्र.२२९/१६-एसडी-४**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ३० मे, २०१७**

**संदर्भ :** समक्रमांकित शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६.

**प्रस्तावना :**

शालेय विद्यार्थ्यास एका जिल्ह्यातून अथवा राज्यातून, दुसऱ्या जिल्ह्यात अथवा राज्यातील शाळेत प्रवेश घ्यावयाचा झाल्यास तसेच CBSE / ICSE / IGCSE / IB या मंडळातील शाळांतील विद्यार्थ्यांना राज्य मंडळाशी संलग्न शाळांमध्ये प्रवेश घ्यावयाचा झाल्यास अथवा राज्य मंडळाशी संलग्नित शाळेतून अन्य मंडळाशी संलग्नित शाळेत प्रवेश घ्यावयाचा झाल्यास, सध्या प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीनुसार, शाळा सोडल्याच्या दाखल्यावर (प्रमाणपत्रावर) शिक्षणाधिकारी (प्राथमिक /माध्यमिक) यांची प्रतिस्वाक्षरी आवश्यक आहे. ही पध्दत केवळ ज्या शाळांनी विद्यार्थ्यांना दाखले दिले आहेत, ती शाळा अधिकृत व मान्यताप्राप्त आहे किंवा नाही हे तपासण्यासाठी होती. तथापि सदर पध्दत बंद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये शाळा सोडल्याचे प्रमाणपत्र नमुना सुधारित करण्यात आला असून यामध्ये शाळा मान्यता क्रमांक तसेच युडायस क्रमांक यांचा उल्लेख असल्यामुळे शाळांच्या अनधिकृततेचा प्रश्न निकालात निघाला आहे. तसेच शाळा सोडल्याचा दाखला हा संबंधित शाळांच्या मुख्याध्यापकांनी प्रमाणित केला असल्यामुळे त्यावर पुन्हा प्रतिस्वाक्षरीची गरज नाही. हे लक्षात घेवून शाळा सोडल्याच्या दाखल्यावर शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) यांच्या प्रतिस्वाक्षरीची उपरोक्त नमूद पध्दत बंद करण्यात येत आहे. हा शासन निर्णय सर्व माध्यम व सर्व व्यवस्थापनांच्या शाळांना लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३०१२३३०५८५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.05.30 12:37:21 +05'30'

**(डॉ. सुवर्णा सि. खरात)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,

३) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे विशेष कार्य अधिकारी,
४) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे,
५) अध्यक्ष, CBSE, नवी दिल्ली,
६) अध्यक्ष, ICSE, नवी दिल्ली,
७) अध्यक्ष, IGCSE, नवी दिल्ली,
८) अध्यक्ष, IB, नवी दिल्ली,
९) शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) शिक्षण संचालक, प्राथमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२) सर्व आयुक्त, महानगरपालिका
१३) विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक, विभागीय मंडळे सर्व,
१४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
१५) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१६) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था, (सर्व),
१७) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, (सर्व),
१८) सर्व गटशिक्षणाधिकारी
१९) सर्व शाळांचे मुख्याध्यापक गटशिक्षणाधिकारी यांचे मार्फत,
२०) निवड नस्ती एसडी-४.